**माजी सैनिक, शहीद जवान व सेवेत कार्यरत असलेले सैनिक व त्यांच्या कुटूंबियाच्या समस्या सोडविण्यासाठी “अमृत जवान अभियान २०२२” राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४४/२८(अर्थ),**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३/०४/२०२२

**प्रस्तावना:-**

राज्यातील विविध शासकीय कार्यालयांमध्ये माजी सैनिक, शहीद जवान,जवान विधवा,जवान कुटुंबिय व सेवेत कार्यरत सैनिकांची कामे असतात. सैन्य सेवा कालावधीत देशाच्या सिमेवर सेवा करीत असताना त्यांना गावाकडील वैयक्तिक व कौटुंबिक कामांकडे लक्ष देता येत नाही. अनेक शासकीय कार्यालयांमध्ये त्यांची कामे प्रलंबित राहतात. सैनिकांची सेवा व समर्पण विचारात घेता सर्व सैनिकांचे मनोबल उंचावण्यासाठी व त्यांचा उचित सन्मान करण्यासाठी जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी “अमृत जवान अभियान २०२२” हा स्तुत्य उपक्रम दिनांक ७ फेब्रुवारी २०२२ ते २३ एप्रिल २०२२ या कालावधीत राबविण्याचा निर्णय घेतला आहे. इतर सर्व जिल्हाधिका-यांनी देखील त्यांच्या जिल्ह्यांमध्ये याप्रकारे उपक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील विविध शासकीय कार्यालयांमध्ये माजी सैनिक, शहीद जवान, जवान विधवा, जवान कुटुंबिय व सेवेत कार्यरत सैनिकांच्या प्रलंबित कामांचा निपटारा जलद होण्यासाठी १ मे, “महाराष्ट्र दिन” हे औचित्य साधून माहे **१ मे, २०२२ ते १५ जून, २०२२ या कालावधीत “अमृत जवान अभियान २०२२” संपूर्ण राज्यात राबविण्यात यावे.** सदर अभियानामध्ये पुढील कार्यवाही करावी.

२. विविध विभागांमध्ये माजी सैनिक, शहीद जवान व सेवेत कार्यरत सैनिकांची अनेक कामे असतात. जसे, महसूल विभागाकडे प्रलंबित फेरफार, बिनशेती व बांधकाम परवानगी, भूसंपादन व पूनर्वसन संबंधी अडचणी, विविध प्रकारचे दाखले, रेशनकार्ड, इत्यादी. पोलिस विभागाकडे विविध तक्रारी/समस्या, समाजकंटकांकडून त्रास होत असलेबाबत तक्रारी, जमीन/जमिनींच्या हद्दी/ पाणी यावरुन होणारे फौजदारी स्वरुपाचे वाद. ग्रामविकास विभागाकडील विविध योजनांचा लाभ, ग्रामपंचायत स्तरावरील रहिवास विषयक विविध बाबी इत्यादी. कृषी विभागाकडील विविध योजनांचा लाभ देण्याकरिता प्रस्ताव तयार करणे. सहकार विभागाकडील कर्ज प्रकरणे इत्यादी, परिवहन विभागाकडील परवाने इत्यादी, तसेच, इतर अनेक विभागांकडील अशा कामांसाठी विशेष मेळावे घेऊन,माजी सैनिक, शहीद जवान व सेवेत कार्यरत सैनिकांचे प्रश्न विशेष प्राधान्याने मार्गी लावावेत.

३. सदर अभियानामध्ये प्रत्येक महिन्याच्या तिस-या सोमवारी “अमृत जवान सन्मान दिन” आयोजित करुन लोकशाही दिनाच्या धर्तीवर संबंधित विभाग प्रमुख व सैनिक अर्जदार यांचे उपस्थितीत सर्व विषयांचा समक्ष आढावा घेण्यात यावा तसेच सदर अभियानाच्या कालावधीत त्यांच्या प्रश्नांच्या निरसनासाठी विशेष मेळावे देखील घेण्यात यावेत.

४. सदर अभियानाची रुपरेषा खालीलप्रमाणे राहील:-

(अ) तालुकास्तरावर अमृत जवान सन्मान अभियान समन्वय समिती स्थापन करण्यात यावी. त्याची संरचना खालीलप्रमाणे राहील:-

| | |
|---|---|
| उपविभागीय अधिकारी | अध्यक्ष |
| उपविभागीय पोलिस अधिकारी | सदस्य |
| गट विकास अधिकारी पंचायत समिती | सदस्य |
| सहा.निबंधक सहकारी संस्था | सदस्य |
| तालुका कृषी अधिकारी | सदस्य |
| मुख्याधिकारी नगरपालिका/नगरपंचायत | सदस्य |
| उप अधिक्षक भूमी अभिलेख | सदस्य |
| तालुक्यातील माजी सैनिक संघटनेचे एक प्रतिनिधी | विशेष निमंत्रित |
| तहसिलदार | सदस्य सचिव |

**तालुकास्तरीय समितीचे अधिकार व कार्ये:-**

१) तालुका स्तरीय समितीची बैठक ७ दिवसांतून किमान एकदा होईल.

२) कार्यरत सैनिक/माजी सैनिक यांचे तालूक्यातील विविध विभागातील प्रलंबित तक्रारी सोडविण्याच्या दृष्टीने सर्व विभागांशी समन्वय साधून तक्रारींचे निवारण करावे.

३) दर महिन्याच्या तिस-या सोमवारी लोकशाही दिनाच्या धर्तीवर “अमृत जवान सन्मान दिन”आयोजित करावा तसेच, प्रश्नांच्या निरसनासाठी विशेष मेळावे आयोजित करावे.

४) सदर समिती या अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आवश्यक त्या शिफारसी जिल्हास्तरीय समितीला करतील.

५) या व्यतिरिक्त तालुकास्तरीय समिती ही जिल्हास्तरीय समितीने वेळोवेळी सोपविलेल्या जबाबदा-या पार पाडेल.

(ब) जिल्हास्तरीय समितीची संरचना खालीलप्रमाणे राहील:-

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| पोलिस अधिक्षक | सदस्य |
| आयुक्त, महानगरपालिका | सदस्य |
| जिल्हा अधिक्षक,कृषी अधिकारी | सदस्य |
| जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था | सदस्य |
| उपवनसंरक्षक | सदस्य |
| उपप्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य |
| अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ | सदस्य |
| अधिक्षक अभियंता, पाटबंधारे मंडळ | सदस्य |
| अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी | सदस्य |
| जिल्हा शल्य चिकीत्सक | सदस्य |
| जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख | सदस्य |
| जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी | सदस्य |
| माजी सैनिक जिल्हा संघटनेचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| संरक्षण विभागातील एक प्रतिनिधी | सदस्य |
| निवासी उपजिल्हाधिकारी | सदस्य सचिव |

५. अभियान कालावधीत पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी :-

१. तालुका तसेच जिल्हास्तरावर हे अभियान राबविण्यासाठी स्वतंत्र कक्षाची स्थापना करावी.

२. या कामाकाजासाठी एक जबाबदार अधिका-याची नेमणूक समन्वय अधिकारी म्हणून करावी.

३. अमृत जवान सन्मान दिनाच्या कार्यक्रमासाठी तालुकास्तरीय विभाग प्रमुख यांना हजर राहणे बंधकारक करावे. हा कार्यक्रम तहसिल कार्यालयात होईल.

४. प्रत्येक तहसिल कार्यालयामध्ये एक खिडकी कक्ष या तत्वाप्रमाणे "सहाय्यता कक्ष" स्थापन करण्यात यावा. सदर कक्षाच्या कामकाजासाठी एका स्वतंत्र कर्मचा-याची नेमणूक करण्यात यावी. सदर कक्षात दररोज दुपारी १२ ते ३ या वेळेत कार्यरत सैनिक/ माजी सैनिक व त्यांचे निकटवर्तीय यांचे विविध विभागांकडील तक्रार अर्ज स्विकारण्यात यावेत. प्राप्त झालेल्या अर्जांची पोहोच संबंधितांना देण्यात यावी व प्राप्त अर्जांचे विभागनिहाय वर्गीकरण करुन संबंधित विभागांकडे त्याच दिवशी पाठविण्यात यावे. सदर अर्जांवर केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संबंधीत विभागाकडून प्राप्त करुन घेऊन जिल्हाधिकारी कार्यालयास अवगत करण्यात यावे.

५. तालुकास्तरावर प्रलंबित प्रश्न सोडविण्यासाठी कार्यरत सैनिक/माजी सैनिक यांचे तालुकानिहाय मेळावे अमृत जवान सन्मान दिनाच्या दिवशी तहसिल कार्यालयात आयोजित करण्यात यावेत. त्यावेळी कार्यरत सैनिक/माजी सैनिक व त्यांचे निकटवर्तीय तसेच शहीद सैनिकांच्या कुटुंबियांना उपस्थित राहण्याचे आवाहन करण्यात यावे.

६. प्रलंबित तक्रारी निवारण करण्यासाठी अभियान कालावधीत प्रत्येक विभागाने कालबध्द कार्यक्रम आयोजित करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हाधिकारी कार्यालयास सादर करावा.

७. या अभियान काळात तक्रार निवारण अनुषंगाने संबंधित अर्जदार यांना योग्य ते मार्गदर्शन करण्यात यावे.

८. या अभियान काळातील कामकाजाचे स्वतंत्र अभिलेख ठेवण्यात यावे व अभियानाच्या यशोगाथा जतन करण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०४१३१५२८००५२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.04.20 11:55:17 +05'30'

**( शिवाजी गोरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२

३. मा. मंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
५. प्रधान सचिव (महसूल विभाग)/प्रधान सचिव ( गृह विभाग)/प्रधान सचिव ( वन विभाग)/
६. प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग)/प्रधान सचिव (जलसंपदा विभाग)/ प्रधान सचिव (उर्जा विभाग)/
७. प्रधान सचिव, (सार्वजनिक आरोग्य विभाग)/ प्रधान सचिव (कृषी विभाग),मंत्रालय,मुंबई-३२
८. विभागीय आयुक्त सर्व,
९. जिल्हाधिकारी सर्व,
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व),
११. पोलिस अधिक्षक (सर्व),
१२. आयुक्त, महानगरपालिका (सर्व),
१३. जिल्हा अधिक्षक,कृषी अधिकारी (सर्व),
१४. जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था (सर्व),
१५. उपवनसंरक्षक (सर्व),
१६. उपप्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व),
१७. अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ (सर्व),
१८. अधिक्षक अभियंता, पाटबंधारे मंडळ (सर्व),
१९. अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी (सर्व),
२०. जिल्हा शल्य चिकीत्सक (सर्व),
२१. जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख (सर्व),
२२. निवासी  उपजिल्हाधिकारी (सर्व),
२३. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे,
२४. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी (सर्व),
२५. निवडनस्ती.